**अवर सचिव पदावरुन उप सचिव**
**पदावर तदर्थ पदोन्नती**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः ससब ११२५/प्र.क्र. ६४/प्रशा १**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ जून, २०२५.

**आदेश**

मंत्रालयीन विभागातील खालील **अवर सचिव (गट-अ, वेतनश्रेणी एस २३ - रु.६७७००-२०८७००)** या संवर्गातील अधिकाऱ्यांना या आदेशाच्या दिनांकापासून **उप सचिव (गट-अ, वेतनश्रेणी एस २५ - रु.७८८००-२०९२००)** या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अवर सचिवांचे नांव | प्रवर्ग | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती निता एकनाथ शिंदे | इमाव | सामान्य प्रशासन विभाग | गृह विभाग |
| २ | श्री. सिध्देश्वर फत्तेसिंगराव मोकाशी | खुला | महसूल व वन विभाग (प्रतिनियुक्ती - मा. मुख्यमंत्री कार्यालय) | प्रपत्र बढती - मा. मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई |
| ३ | श्री. गणेश गोपीनाथ बडे | खुला | गृह निर्माण विभाग (प्रतिनियुक्ती - मा.मंत्री पाणी पुरवठा व स्वच्छता) | प्रपत्र बढती - मा.मंत्री पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई |
| ४ | श्री. आबासाहेब आत्माराम कवळे | खुला | सामान्य प्रशासन विभाग | विधि व न्याय विभाग |

२. श्री. सि. फ. मोकाशी, श्री. ग. गो. बडे यांना, महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम, ४० परिशिष्ट-२, अट क्र.१८ नुसार उप सचिव पदावर प्रपत्र बढती (तदर्थ पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसार प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा राहील.

३. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १६ ब यांच्या शासन निर्णय दिनांक ०७.०५.२०२१ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दिनांक २५.०५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात येत आहेत.

४. सदर अधिकाऱ्यांना उप सचिव पदावरील **तदर्थ** पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| (अ) | ही तदर्थ पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरुपात मंत्रालयीन विभागातील उप सचिव संवर्गातील अधिकारी प्रतिनियुक्तीवर गेल्यामुळे रिक्त झालेल्या पदांवर प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे. |
| (आ) | या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत. |
| (इ) | सदर तदर्थ पदोन्नती प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले अधिकारी/कर्मचारी रुजू होईपर्यंत किंवा पदोन्नतीच्या आदेशापासून ११ महिन्यांसाठी यापैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी असेल. |
| (ई) | उप सचिव संवर्गातील प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी/कर्मचारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी उप सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्याला पदावनत करण्याच्या अधीन राहून सदर तदर्थ पदोन्नत्या देण्यात येत आहेत. |
| (उ) | सदर तदर्थ पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७, होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे. |
| (ऊ) | सदर तदर्थ पदोन्नती मा.उच्च न्यायालय,मुंबई येथील प्रलंबित असलेल्या रिट पिटीशन क्र.३३१०/२०२१ व रिट पिटीशन क्र.३३११/२०२१ यामधील आय.ए.क्र.१८५४/२०२१ व १८५५/२०२१ तसेच रिट पिटीशन क्र.३३१२/२०२१ मध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे. |
| (ए) | सदर तदर्थ पदोन्नती मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथील प्रलंबित मूळ अर्ज क्र.४८८/२०१७ (श्री.किरण जाधव व इतर) मध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे. |
| (ऐ) | सदर तदर्थ पदोन्नती मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे प्रलंबित अर्ज क्र. १०६६/१९ (श्री. उल्हास शंकर भोईटे व इतर) मध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे. |

५. सदर अधिकाऱ्यांची उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही, या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित विभागाने खातरजमा करुन संबंधित अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु असल्यास या विभागास अवगत करावे.

६. उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी हे आदेश निघाल्याच्या तारखेपासून **तीस** दिवसांमध्ये उप सचिव पदावर रुजू होणे आवश्यक आहे. पदोन्नत अधिकाऱ्यांस पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याने विहित मुदतीत कार्यमुक्त करावे.

७. संबंधित अवर सचिव यांनी उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसअरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६ व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसअरव्ही २०१८/प्र.क्र.१५९/कायासन-१२, दिनांक ०१.०८.२०१९ मधील तरतूदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांचे नांव सन २०२४-२५ या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि पुढील सन २०२५-२६ व सन २०२६-२७ या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता सन २०२७-२८ च्या निवडसूचीवर उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

८. महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणातील तरतुदीनुसार पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण घेणे संबंधित पदोन्नत अधिकाऱ्यांवर बंधनकारक राहील अन्यथा संबंधित उप सचिवांस अवर सचिव पदावर पदावनत करण्यात येईल.

९. पदोन्नत अधिकाऱ्यांना संबंधित विभागांनी कार्यमुक्त केल्याबाबतच्या तसेच उप सचिव पदावर रुजू केल्याबाबतच्या आदेशांच्या प्रती या विभागास तात्काळ पाठवाव्यात.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६०९१९२०५५०६०७ हा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.06.09 19:21:51 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

२. मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स./प्र.स./सचिव.
३. अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग.
५. सह/उप सचिव (आस्थापना) संबंधित मंत्रालयीन विभाग.
६. सह/उप सचिव (कार्यासन मंआस्था), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. संबंधित अधिकारी (विभागामार्फत).
८. निवड नस्ती (कार्यासन प्रशा-१)